**डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील भाषा शास्त्र विभाग, प्रेक्षागृह हॉल, इमारत क्र.१, मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह या इमारतींचे नुतनीकरण करण्याकरिता निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र: डीसीआय-२०१९/प्र.क्र.२२/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०५ जुलै, २०२३.

संदर्भ :- १. विभागाचा समक्रमांकाचा दि.१५.०२.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
२. प्र-कुलसचिव डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे यांचे दि.२५.०४.२०२३ रोजीचे पत्र.
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना :-**

डेक्कन कॉलेज ही संस्था भारतातील तीन जुन्या संस्थापैकी एक आहे. दि.०६.१०.१८२१ रोजी हिंदू कॉलेज नामक संस्था म्हणून अस्तित्वात आली. दि.१५.११.१८६४ रोजी या कॉलेजचे नाव बदलुन डेक्कन कॉलेज असे करण्यात आले. डेक्कन कॉलेज ही संस्था डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था या नावाने दि.१७.०८.१९३९ रोजी सुरु केली. विद्यापीठातील इमारती १२५ वर्षापुर्वी बांधलेल्या असूल्यामुळे डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील भाषा शास्त्र विभाग, प्रेक्षागृह हॉल, इमारत क्र.१, मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह या इमारतींचे नुतनीकरण करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदरहू नुतनीकरणाचे काम करण्यासाठी निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने संदर्भ क्र.३ येथील परिपत्रकास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील भाषा शास्त्र विभाग,प्रेक्षागृह हॉल, इमारत क्र.१, मुला-मुलींचे वसतिगृह, विद्याशाखा वसतिगृह आणि विश्रामगृह या इमारतींचे नुतनीकरण करण्याकरिता रु.१,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. विद्यापीठाने कामाची प्रगती व झालेला खर्च याचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास पाठविण्याची व्यवस्था करावी.
२. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.
३. सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता भासणार नाही याद्दष्टीन काम करण्यात यावे.
४. सदरहू रक्कमेचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.
५. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींचे पालन करुन खरेदी करण्यात यावी.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद तातडीने डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच

वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेचा विकास (२२०२ ०९१४), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०७०६१८२८२५३३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD
SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c66207630576336152194 4ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2023.07.06 18:29:33 +05'30'

**( शरद कोकाटे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. कुलगुरू, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे.
३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ प्रती)
६. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
९. अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. महालेखापाल, (लेखापरीक्षा) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
१४. निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.